

PRATHAM BOOKS
A Book in Every Child's Hand

वाचन पातळी ३

# मोरू नावाचे कोडे

**Author:** Rukmini Banerji
**Illustrator:** Nina Sabnani
**Translator:** Madhav Chavan



मोरूच्या आवडी निवडी काही विचारू नका. एखादी गोष्ट आवडली, की तिच्याच मागे! एखादी आवडली नाही की बस! तिचा अगदी तिरस्कार करायचा. काही करायचे मनात नसले की कोणीही त्याला ते काम करायला लावू शकत नसे आणि एखादी गोष्ट करायचे ठरवले की त्याला अडवणे अशक्य. मोरू म्हणजे एक कोडेच होते.



झाडावर चढणे आणि कैऱ्या चोरणे त्याला खास आवडे. घनदाट जंगलातल्या चित्त्याचा आव आणून फांद्यांवरून दबा धरत इकडून तिकडे तो जायचा. हिरवागार कुरकुरीत नाकतोडा पकडणे, नाहीतर पिवळे धमक फुलपाखरू चिमटीत धरून बोटांवर लागलेला पावडरसारखा पिवळा रंग न्याहाळणे अशा गोष्टींची त्याला फार आवड. पतंग उडवण्यात त्याला मजा वाटायची. जितका उंच जाईल तितके छान. उंचच उंच इमारतीच्या गच्चीवर जाऊन सूर्याला गवसणी घालणाऱ्या गरुडाप्रमाणे पतंगाला उंच भरारी देणे त्याला खूपच आवडायचे.



19

मोरूला अंक आवडत. 1 फारच हडकुळा आणि बिचारा एकटा एकटा वाटे त्याला. 100 कसा गलेलठ्ठ श्रीमंत दिसायचा. 9 वाटे नखरेल, आणि 19 मध्ये तर तो एक अंकाच्या शेजारी एखाद्या लाजऱ्या नव्या नवरीप्रमाणे वाटे. आकडे म्हणजे जणू एक न संपणारा जिना. मोरू कल्पना करायचा की आपण एकेका पायरीवरून उड्या मारत धावत आहोत. कधी दोन, कधी तीन, कधी चार-चार पायऱ्या सोडून उड्या पडायच्या.





थकवा आला तर ह्या जिन्याच्या कठड्यावरून घसरगुंडी करून तो मनातल्या मनात तळ गाठायचा. पोट भरायच्या आतच ताटातला भात संपून जातो तसे अंक संपत नसत आणि रंगत आलेला खेळ सोडून मित्र घरी जातात तसे अंक घरी जात नसत. अंक नेहमी सोबत असायचे. अनंत आणि अपार मजा. मिसळायची, निवडायची, जोडायची, तोडायची, रांगेत लावायची, मोडून टाकायची, उडवून द्यायची, एकत्र करायची, मजाच मजा.



मोरूला शाळेत जायला आवडायचे कारण त्याचे मित्रसुद्धा शाळेत जात. त्याला शाळेचे मोठे मैदान आवडायचे पण वर्गात जाणे अगदी नको वाटे. त्याला त्यांचे गुरुजी आवडत नसत. वर्गात कोंडल्यासारखे वाटायचे. मुलांना तिथे अनेक गोष्टी करता येत नसत. प्रश्न विचारायचे नाहीत. काही सांगायचे असले तरी बोलायचे नाही. हलायचे नाही. चालायचे नाही. गुरुजी तापट होते. मोरूला खात्री होती की त्यांना मुले अजिबात आवडत नाहीत. कदाचित त्यांना शिकविणे आवडत नसेल. कदाचित शाळेत यायलाही आवडत नसेल. काहीही असो, मुलांनाही गुरुजी आवडत नसत.



दररोज सकाळी गुरुजी फळ्यावर काही ना काही लिहायचे. मग मोठ्ठ्या आवाजात मुलांना ते पाटीवर उतरवून घ्यायला सांगायचे. त्यानंतर ते वर्गाबाहेर जायचे. जर मुलांनी फळ्यावरचे नीट लिहून काढले तर ते पाट्या तपासायचे. जर लिहिले नाही तर ते रागवायचे. एकदा रागावले की ते मुलांना काहीबाही नावे ठेवायचे. जर फारच चिडले तर फार जोरात मारायचे.



एकदा गुरुजींनी फळ्यावर काही गणिते लिहिली. होती तशी सोपी. पण फार कंटाळवाणी. खूप गणिते होती आणि सगळी एकसारखी. मोरूने गणिते केली नाहीत. त्याला ती करावीशी वाटली नाहीत आणि शिवाय त्याच्यापाशी पाटी नव्हती. त्याची पाटी फुटली होती आणि त्याच्या आईकडे नवी घ्यायला पैसे नव्हते. तेव्हा गणित सोडविण्याऐवजी तो भिंतीवर चढणाऱ्या मुंग्या मोजत बसला. मग त्याचे लक्ष खिडकीबाहेर झाडाकडे गेले. पाने कशी सुरेख होती. सुरेख पानांच्या सुरेख सावल्या होत्या. शाळेच्या कुंपणाच्या भिंतीतल्या अनेक विटा तुटल्या होत्या आणि मध्ये मध्ये भोके पडली होती. मोरूने मनातल्या मनात गणित मांडले की एका विटेला पाच रुपये पडले तर सर्व मोडलेल्या विटा बदलून सर्व भोके बुजवायला एक हजाराहून अधिक रुपये लागतील.





“मोरू”, गुरुजी ओरडले. “काय चालले आहे?” मोरूचा चेहरा कोरा करकरीत. काहीच भाव नव्हते.
“तुझी पाटी कोठे आहे? का आणली नाहीस?”, गुरुजी पुन्हा ओरडले. गुरुजी रागावले आहेत हे मोरूला दिसत होते. मोरू म्हणाला, “माझी जुनी पाटी फुटली आणि नवी घ्यायला माझ्याकडे पैसे नाहीत.”
गुरुजी चिडले आणि हातातल्या काठीने त्यांनी मोरूला एक फटका दिला. मोरू हळू आवाजात म्हणाला.





“आणि माझ्याकडे पाटी असली तरी मी गणिते करणार नाही कारण मला करायची नाहीत.” गुरुजी एकदम भडकले. त्यांनी मोरूला एक जोरदार थप्पड लगावली. मोरूचा गाल लाल भडक झाला. अचानक गरम अश्रूंनी त्याचे डोळे भरून आले. तो उभा राहिला आणि वर्गाबाहेर धावत सुटला. व्हरांड्यातून, मोकळ्या मैदानातून, मोडलेल्या फाटकातून दूर दूर धावत सुटला.





दुसऱ्या दिवशी सकाळी आईने मोरूला शाळेत जाण्यासाठी उठवले. पण मोरू काही उठेना. डोळे घट्ट मिटून तो अंथरुणात पडून राहिला. तिसऱ्या दिवशीसुद्धा तेच. चौथ्या, पाचव्या आणि नंतरच्या दिवशीसुद्धा तेच. कोणीच मोरूला समजावू शकत नव्हते. आठवडा गेला. महिना झाला. मोरू आपला घरासमोरच्या भिंतीवर बसून असायचा.



कधी कधी बाजारात हिंडायला जायचा आणि तास-तास भटकत असायचा. कधीतरी गच्चीवरून पतंग उडवायचा पण त्यात गम्मत नव्हती कारण आकाशात दुसरे पतंगच नसत. आईने रागे भरले, भावाने चिडविले, आजीने विनविले, मामाने लालूच दाखवून पाहिली आणि मित्रांनी समजावले. पण मोरू कोणाचेच ऐकेना आणि शाळेत काही जाईना.



पावसाळा आला आणि शाळा उन्हाळ्याच्या सुट्टीनंतर उघडली. सगळ्यांना वाटले आता तरी मोरू इतर मुलांबरोबर शाळेत जाईल. “नाही”, हे मोरूचे ठाम उत्तर. एक वर्ष गेले. एक न सुटणारे कोडे म्हणून सर्वांनी मोरूची आशा सोडली. कदाचित मोरूने आपलीच आशा सोडली असेल. तो इतर गोष्टी करू लागला.



बाजारात जाऊन भाजीवाल्यांना त्रास दे, स्वत:सारख्या शाळा सोडलेल्या इतर मुलांना एकत्र करून शाळेत जाणाऱ्यांना टोमणे मारून चिडव, असले उद्योग तो करू लागला. कधी मित्रांच्या वहीतील कागद फाडून त्यांची विमाने करायचा तर कधी गच्चीत जाऊन गलोलीने येणाऱ्या जाणाऱ्यांना खडे मारायचा.



एके दिवशी जुने गुरुजी गेले. त्यांच्या जागी एक नवे, तरुण शिक्षक आले त्या दिवशी मोरू भिंतीवर बसून शाळेत जाणाऱ्या मुलांना न्याहाळत होता. हल्ली, तो शाळेत का जात नाही असे त्याला कुणी विचारत नसे. उलट मोरू आपल्याला त्रास देईल म्हणून ती मुले त्याला टाळत असत. नवे शिक्षक त्याच रस्त्याने जात होते. शिक्षकांनी मोरूकडे पाहिले आणि मोरूने शिक्षकांकडे. कुणी हसले नाही की बोलले नाही. दुसऱ्या दिवशी त्याच ठिकाणी त्याच वेळी मोरूने भिंतीवरून खाली पाहिले. शिक्षकांनी त्याच्याकडे वर पाहिले आणि ते हसले. छोटेसेच हसू होते ते. मोरूने भिंतीवरून उडी मारली आणि तो धूम पळाला.



काही दिवसानंतर शिक्षक जवळून निघाले होते. त्यांच्याकडे एक मोठी पिशवी होती. पिशवी खूप जड होती. शिक्षकांना बराच त्रास होत होता. मोरूने डोके खाजविले. शिक्षक त्याच्या पुढून सावकाश चालत गेले. मोरूने विचार केला आणि त्यांच्या मागे धावत गेला. काहीही न बोलता त्याने पिशवीची एक बाजू धरली. शिक्षकांचे ओझे हलके झाले आणि दोघांना ती जड पिशवी घेऊन चटकन शाळेत जाता आले.



वर्गात पोहोचल्यावर पिशवी शिक्षकांच्या टेबलावर व्यवस्थित ठेवली. शिक्षकांनी पिशवी उघडली आणि मोरूला आत पाहू दिले. रंगीबेरंगी, निरनिराळ्या आकारांची, प्रकारांची अशी खूपच खूप पुस्तके होती. त्यांना नवीन पुस्तकांचा छान गंध होता. हाताला ती चकचकीत लागत होती.

“मला ही पुस्तके काढायला मदत करशील का?”, शिक्षकांनी विचारले. मोरू पुस्तके काढू लागला. त्यांमध्ये कव्हरवर चित्रे असलेली, आत गोष्टी असलेली पुस्तके होती. काही पुस्तके मोठ्या अक्षरात लिहिलेली होती.

काहींमध्ये इतके लिहिले होते की शब्द नुसते कोंबून भरावे लागले असतील. मोरूची उत्कंठा वाढत चालली होती. त्याने दोन वर्षांत पुस्तकांना हातही लावला नव्हता.




दुसऱ्या दिवशी शाळा सुटून अगदी सगळी मुले घरी जाईपर्यंत मोरूने वाट पाहिली. त्यानंतर शिक्षक एकटेच होते. मोरू चुपचाप गेला आणि दारापाशी उभा राहिला.

हसण्या-खिदळण्याचे आवाज, गोंगाट आणि मुलांचा आरडाओरडा नसल्यामुळे शाळा भयाण वाटत होती. शिक्षकांनी वर पाहिले.

“बरे झाले तू आलास. मला तुझी मदत हवी होती”, ते म्हणाले. मोरूला कुतूहल वाटले शिक्षकांना काय मदत हवी असेल बरे? त्यांना मदत करायला शाळेत कितीतरी मुले होती.

अगदी सध्या सरळ आवाजात शिक्षक म्हणाले, “ही पुस्तके वेगवेगळ्या प्रकारात मांडायला तू मदत करू शकशील का?”



मोरू जमिनीवर बसला. पुस्तके त्याच्याभोवती पसरली होती. ह्या चित्त्याच्या गोष्टीला हत्ती आणि उंटांच्या पुस्तकाबरोबर बरे वाटेल. परीकथा सगळ्या देवदेवतांच्या पुस्तकांबरोबर बऱ्या. साहसकथा एकट्याच बऱ्या की त्यांना वीरांच्या आणि प्रसिद्ध लोकांच्या पुस्तकांबोबर ठेवावे?



त्यानंतर आली अंक असलेली पुस्तके. मोरूच्या बोटांचा आणि डोळ्यांचा वेग जरा मंदावला. जाडजूड संख्या बारकुल्या अंकांबरोबर नाचत होत्या. दोन अंक एकमेकांवर डगमगत उभे होते. असे वाटत होते जणू इमारतीचा पाया भरलेला नसावा आणि ती आता कोणत्याही क्षणी पडते की काय? गुणाकाराची गणिते ठेंगणी ठुसकी दिसत होती. वर बारीक आणि खाली जसजसे आकडे वाढत जात होते तसतशी रुंदीही वाढत जात होती.

भागाकार नेमका उलटा. वरच्या भागावर कितीतरी लिहावे लागते आणि भागाकार करत करत जर तुम्ही थोडी काळजी घेतलीत तर खाली खाली एक ऐटबाज शेपटी तयार होते. नशीबवान असाल तर शेवटी राहते शून्य - म्हणजे काहीच नाही. एक एक करून निरनिराळे आकडे आणि युक्त्या मोरूला आठवायला लागल्या. कोडे सुटू लागले.



अंधार झाला होता. शाळेत दिवे नव्हते. “मोरू, आता घरी जायची वेळ झाली.” शिक्षक म्हणाले. “पण उद्या मात्र सगळी मुले असताना येशील का रे?”, दुसऱ्या दिवशी शाळा सुरू होताच मोरू आला. सगळ्या मुलांना आश्र्चर्य वाटले आणि भीतीही. मोरू आता मोहल्ल्याचा “दादा” झाला होता ना? “आता मला मदतनीस मिळाला आहे”, शिक्षक म्हणाले. त्यांनी मोरूला लहान मुलांमध्ये बसविले.

तेथे पुस्तके होती. पुस्तकांमध्ये दिलेला अभ्यास त्यांच्या पानांवरच सोडवायचा होता. “ह्या मुलांना संख्या चढत्या आणि उतरत्या क्रमाने लावायला शिकवशील का?” सगळी मुले धडपडत मोरूभोवती जमा झाली. मोरूसारख्या भीतिदायक दादाला एवढे सगळे येते याचे त्यांना आश्र्चर्य वाटत होते.




त्याने मुलांना एका रांगेत उभे केले. सगळ्यात उंचाड्यापासून सगळ्यात बुटक्यापर्यंत एका रांगेत. मग त्याने त्यांच्या हातात संख्या असलेली कार्डे दिली. झाले सोपे काम. एकदा उंचीप्रमाणे उभे केले की लहान मोठ्या संख्या एकेकाच्या हातात देणे समजायला एकदम सोपे.

मोरू दररोज थोड्या वेळासाठी यायचा आणि शिक्षक दररोज त्याला अधिक मोठी कामगिरी सांगायचे. दिवसागणिक त्याचा संख्यांच्या बाबतीतला उत्साह वाढायला लागला. त्याच्या ज्ञानामुळे आणि कौशल्यामुळे छोट्या मुलांनाही त्याची लागण व्हायला लागली.



एक महिना उलटला. एके दिवशी मोरूची आई सकाळी जरा उशिराने त्याला शोधत होती. तो कोठेच सापडेना. तिने गच्चीवर पाहिले पण त्याचे पतंग मलूलपणे पडून होते. ज्या भिंतीवर तो पाय हलवीत बसायचा तिथेही पाहिले. ती रिकामी ओकीबोकी होती. तिने आंब्याचा झाडावर पाहिले. वाऱ्याने पाने हलत आणि कुजबुजत होती पण फांदीवर मोरू नव्हता.



ती बाजारात गेली, भाजीवाल्या बाया आपल्या भाज्या विकत होत्या; पण त्यांना त्रास देणारी नेहमीची पुंड मुले आसपास नव्हती. अखेर ती गल्लीतून पुढे गेली आणि शाळेच्या खिडकीतून आत सहजच तिचे लक्ष गेले.





सापडला मोरू! खाली मान घालून तो लक्षपूर्वक त्याच्या वहीत पाहत होता. शिकण्यात गढलेल्या मोरूच्या कपाळावर विचारांच्या सुरकुत्या होत्या आणि त्याच्या डोळ्यांमध्ये खोलवर ज्ञान शोषून घेण्याचे भाव होते. त्याच्या वयाच्या इतर मुलांबरोबर गणिताची गुंतागुंतीची उदाहरणे सोडविण्यात तो मग्न होता. शिक्षकांचेही लक्ष खिडकीतून बाहेर गेले आणि त्यांनी एक छानसे स्मित केले. मोरूची आईसुद्धा उत्तरादाखल आनंदाने हसली.

मोरू पुन्हा शाळेत होता. आता तो शिकत होता. त्याला समजत होते आणि अधिक महत्त्वाचे म्हणजे ह्याखेपेस त्याला शाळा आणि शिकणे, दोन्ही आवडत होते.
मोरूचे कोडे सुटले होते.

Story Attribution:

This story: मोरू नावाचे कोडे is translated by Madhav Chavan . The © for this translation lies with Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'Counting on Moru', by Rukmini Banerji . © Pratham Books , 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. The development of the print version of this book has been supported by Pratham e.V. and Project Dharma. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

Illustration Attributions:

Cover page: Boys playing with numbers, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Boy's face , by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Boy plucking mangoes from a tree and a butterfly nearby, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Boy sliding down a spiral staircase with numbers around him, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Smiling and waving numbers, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Children going to school, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Angry teacher shouting at a boy, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Boy looking out of window in class, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Teacher scolding boy, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Teacher scolding boy, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

Illustration Attributions:

Page 11: Mother waking son , by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 12: Boy walking sadly, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 13: Boy throwing a pail of water and a catapult, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 14: Vegetable vendor looking up and paper planes nearby by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 15: Boy sitting on a window sill and looking at a man, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 16: Boy offering to help a man with a heavy bag by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 17: Boy looking on as man has bags on a table by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 18: Boy and man arranging books, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 19: Boy reading books while crouched on the floor, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 20: Dancing numbers, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 21: Happy boy pointing, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 22: Children standing in order of height holding number placards, by Nina Sabnani © Pratham Books, 2012. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# मोरू नावाचे कोडे
(Marathi)

मोरूच्या जगात संख्या नाचायच्या, अंक खुणावायचे आणि भागाकाराला रुबाबदार शेपूट असायचे. पण एके दिवशी हे जग कोलमडून पडले. मोरू टवाळखोर गुंड झाला. पण हे पुन्हा बदलायला कोणीतरी मदत केली. कोण होते ते?

या पुस्तकाची वाचन पातळी ३ आहे. आपले आपण वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

